महाबळेश्वर तालुका, जिल्हा सातारा मधील पशुवैद्यकिय दवाखाना श्रेणी २ चे स्थलांतर करणेबाबत...
१. पशुवैद्यकिय दवाखाना श्रेणी २ मेटगुताड
२. पशुवैद्यकिय दवाखाना श्रेणी- २ मांघर

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.** DAHD-१२०११/६८/२०२४-DAHD-AH१ ( ८१४५८०)
मंत्रालय विस्तार,मादाम कामा मार्ग, दालन क्र. ५१८,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
दि. २३/०७/२०२४

**वाचा:-** १. कृषि व पदुम, विभाग शासन निर्णय क्र.जिवायो-२०१०/प्र.क्र.२९१/पदुम-४,दि. ३०.०८.२०१०
२. कृषि व पदुम, विभाग शासन पुरक पत्र क्र. जिवायो-२०१०/प्र.क्र.२९१/पदुम-४, दि.०१.०७.२०११
३. आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र. व्हीएचडी/२७ (भाग-२)/९०/२०२२-२४, पसं-१२, दि.०५/०१/२०२४

**प्रस्तावना:-**

सातारा जिल्ह्यातील महाबळेश्वर हा तालुका भौगोलिक दृष्ट्या अतिदुर्गम व डोंगरी तालुका असून सद्यस्थितीत तालुक्यात १३ पशुवैद्यकीय दवाखाने (श्रेणी १ चे २ व श्रेणी २ चे ११ असे एकूण १३) कार्यरत असून, सदर दवाखान्यांचे कार्यक्षेत्र व कार्यक्षेत्रात असणारे पशुधन संख्या यामध्ये विविधता आहे. काही पशुवैद्यकीय दवाखान्यांच्या कार्यक्षेत्रात अतिशय कमी गावे व पशुधन संख्या आहे तर काही पशुवैद्यकीय दवाखान्यांच्या कार्यक्षेत्रात जास्त गावे येतात.

महाबळेश्वर तालुक्यात पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ मध्ये पवैद श्रेणी-२ मेटगुताड व पवैद श्रेणी-२ मांघर हे कार्यरत आहेत. पवैद श्रेणी-२ मेटगुताड या दवाखान्याच्या कार्यक्षेत्रामध्ये मेटगुताड, अवकाळी, क्षेत्र महाबळेश्वर, नाकिंदा ही ४ गावे व पशुधन घटक ३८२ येतात. पवैद श्रेणी-२ मांघर या दवाखान्याच्या कार्यक्षेत्रामध्ये मांघर व पारुट ही २ गावे व पशुधन घटक १६१ येतात.

महाबळेश्वर तालुक्यातीलच मौजे दरे तांब व मौजे खरोशी येथे नवीन पशुवैद्यकीय दवाखान्याची मागणी आहे. मौजे दरे गाव पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी २ वाघावळेचे कार्यक्षेत्रात तर मौजे खरोशी हे गाव पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी- २ गोगवे च्या कार्यक्षेत्रात येते. पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी- २ बाधावळे हा दवाखाना महाबळेश्वर तालुक्यातील कांदाटी खोऱ्यात असून सदर दवाखान्याच्या कार्यक्षेत्रात सध्या १६ गावे व १४७२ पशुधन घटक आहेत. या दवाखान्याच्या कार्यक्षेत्रात असणारे दरे तांब हे गाव मुख्यालय वाघावळे पासून अंदाजे ३० किलोमीटर अंतरावर आहे. पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी २ गोगवेच्या कार्यक्षेत्रात एकूण ३६ गावे असून पशुधन घटक ३७१९ आहे. गोगवे मुख्यालयापासून काही गावे ६० ते ६५ किलोमीटर अंतरावर आहेत. ही भौगोलिक वस्तुस्थिती व अतिदुर्गमता विचारात घेता, संबंधित गावांतील पशुपालकांना दवाखाना अतिदूर असल्याच्या कारणास्तव पशुवैद्यकीय सेवा देण्यास मर्यादा येत असल्याचे निदर्शनास येत आहे.

जिल्हा परिषद सातारा ठराव समिती दि.१५.१२.२०२३ रोजीच्या सभेमध्ये विषय क्र.१३, ठराव क्र.६५८ अन्वये सातारा जिल्ह्यातील महाबळेश्वर तालुक्यातील पशुवैद्यकिय दवाखाना श्रेणी-२ मेटगुताड, ता. महाबळेश्वर जि. सातारा हा दवाखाना मौजे दरे तांब ता. महाबळेश्वर जि. सातारा येथे व पशुवैद्यकिय दवाखाना श्रेणी- २ मांघर, ता. महाबळेश्वर जि. सातारा हा दवाखाना मौजे खरोशी ता. महाबळेश्वर जि. सातारा येथे स्थलांतर करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सातारा जिल्ह्यातील महाबळेश्वर तालुक्यातील पशुवैद्यकिय दवाखाना श्रेणी-२ मेटगुताड, ता.महाबळेश्वर जि. सातारा हा मौजे दरे तांब ता. महाबळेश्वर जि. सातारा येथे स्थलांतर करण्यास व पशुवैद्यकिय दवाखाना श्रेणी-२ मांघर, ता. महाबळेश्वर जि. सातारा हा मौजे खरोशी ता. महाबळेश्वर जि. सातारा येथे स्थलांतर करण्यास याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांनी वरील दोन्हीही संस्थेचे मंजूर अधिकारी, कर्मचारी वर्गासह मौजे दरेतांब व मौजे खरोशी या ठिकाणी स्थलांतर करुन पशुवैद्यकीय दवाखाना कार्यान्वीत करावयाचा आहे. जेणेकरून, या पशुवैद्यकीय दवाखान्याच्या कार्यक्षेत्रातील शेतकरी / पशुपालक यांचेकडील पशुधनास पशुवैद्यकीय सेवा उपलब्ध होतील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०७२३१६१५१३७१०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MANSING UTTAMRAO PATIL

Digitally signed by MANSING UTTAMRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=3ba28caa058b8cad7f6c3793fb39c98ab0287353f024576ece2b3e8f549e614b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B3995210971964192 64C059F0A083B9DB52ECFAFA693832FAEA6ED15299044C, cn=MANSING UTTAMRAO PATIL
Date: 2024.07.23 16:26:48 +05'30'

**( मानसिंग पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. मा. मंत्री, पशुसंवर्धन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा
४. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, पुणे
५. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, सातारा
६. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा
७. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
८. निवड नस्ती .